**मा.राज्यपाल यांच्या अधिसुचनेनुसार अनुसूचित क्षेत्रातील सुनिश्चित केलेली १२ संवर्गातील पदे स्थानिक अनुसूचित जमातीतील उमेदवारांमधुन भरण्याच्या अनुषंगाने करावयाची पुढील कार्यवाही.**

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन निर्णय क्र. : बीसीसी -२०१४/ प्र.क्र.२१३A /१४/१६-ब**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरू चौक
मंत्रालय, मुंबई -४०००३२.
दिनांक: ५ मार्च, २०१५.

<u>वाचा:-</u> १) शासन निर्णय सामान्य प्रशासन विभाग क्र.बीसीसी १०७२/जे, दि.६ जून १९७२.
२) शासन निर्णय सामान्य प्रशासन विभाग क्र.बीसीसी ११८७/२७७६/सीआर २९६/८७/१६-ब, दि.१५ ऑक्टोबर.१९८७.
३) शासन निर्णय सामान्य प्रशासन विभाग क्र.बीसीसी १०९३/२१६७/सीआर १४१/९३/१६-ब, दि.१८जून १९९४.
४) शासन निर्णय सामान्य प्रशासन विभाग क्र.बीसीसी १०९३/२१६७/सीआर १४१/९३१६-ब, दि. १ सप्टेंबर, १९९७.
५) शासन निर्णय सामान्य प्रशासन विभाग क्र.बीसीसी १०९८/प्र.क्र-११६/९८/१६-ब, दि.२० सप्टेंबर १९९९.
६) शासन निर्णय सामान्य प्रशासन विभाग क्र.बीसीसी २००१/३५३/प्र.क्र-१४/२०००/१६-ब, दि.१३ ऑगस्ट २००२.
७) महाराष्ट्र राज्य लोकसेवा (अनुसूचित जाती, अनुसूचित जमाती, निरधिसूचित जाती (विमुक्त जाती),भटक्या जमाती, विशेष मागास प्रवर्ग आणि इतर मागासवर्ग यांच्यासाठी आरक्षण) अधिनियम, २००१
८) शासन अधिसूचना क्र.आरबीटीसी/ई-१३०१३(४)/अधिसूचना-१/४७४/२०१४, दि.९ जुन,२०१४
९) शासन अधिसूचना क्र.आरबीटीसी/ई-१३०१३(४)/अधिसूचना-२/४७४/२०१४/७३०, दि.१४ ऑगस्ट,२०१४
१०) शासन परिपत्रक क्र.बीसीसी-२०१४/प्र.क्र.२१३A/१४/१६-ब, दि.३१ जुलै,२०१४
११) शासन अधिसूचना क्र.आरबीटीसी/ई-११०१९(१६)(२०१४)/अधिसूचना-५/११२२/२०१४, दि.३१.१०.२०१४

**प्रस्तावना:-**

राज्यात शासकीय सेवेमध्ये सरळसेवा पद भरतीमध्ये अनुसूचित जमाती प्रवर्गासाठी ७ टक्के आरक्षण विहित करण्यात आले आहे.

२. वरील संदर्भाधीन अनु.क्र. १ ते ६ येथील शासन निर्णयान्वये १९७२ पासून व तद् नंतर वेळोवेळी निर्गमित केलेल्या शासन निर्णयानुसार आदिवासी बहुल जिल्हयात अनुसूचित जमातीच्या लोकसंख्येच्या आधारे जिल्हा निहाय संवर्गातील गट-क व गट-ड सेवांमधील पदे भरतांना अनुसूचित जमातीसाठी खालील प्रमाणे वाढीव आरक्षण विहित केले आहे. :-

| जिल्हा | ठाणे | धुळे | नाशिक | रायगड | नंदुरबार | चंद्रपूर | यवतमाळ | गडचिरोली |
|---|---|---|---|---|---|---|---|---|
| अनुसूचित जमातीसाठी वाढीव आरक्षण | २२% | २२% | २२% | ९% | २२% | १५% | १४% | २४% |

३. संदर्भाधीन अनु. क्र.८ येथील अधिसूचनेन्वये मा.राज्यपाल महोदयांनी भारतीय राज्य घटनेच्या पाचव्या सूचीतील परिच्छेद ५ मधील उप परिच्छेद १ नुसार प्रदान केलेल्या अधिकारानुसार, अनुसूचित क्षेत्रामध्ये देण्यात येणाऱ्या विविध सेवा सुविधांच्या दर्जामध्ये सुधारणा करण्याच्या दृष्टीने, अनुसूचित क्षेत्रामधील आदिवासींच्या सर्वांगीण विकासास गती देण्याकरिता, स्थानिक बोली-भाषा आणि संस्कृतीच्या ज्ञानाच्या अभावी निर्माण होणारे संदेशवहनाचे प्रश्न सोडविण्यासाठी, अनुसूचित क्षेत्रामधील विविध संस्थांमध्ये कर्मचारीवृंदाच्या वारंवार गैरहजर राहण्यामुळे निर्माण होणाऱ्या अडचणींचे निराकरण करण्याच्या हेतूने आणि अनुसूचित क्षेत्रामध्ये राहणाऱ्या आदिवासींच्या कल्याण व प्रगती करिता शासनामार्फत राबविण्यात येणारे कार्यक्रम आणि योजनांच्या अंमलबजावणीच्या दर्जात सुधारणा करण्याकरिता, अनुसूचित क्षेत्रामधील सरळसेवेने भरण्यात येणारी १) तलाठी, २) सर्वेक्षक, ३) ग्रामसेवक, ४) अंगणवाडी पर्यवेक्षक, ५) शिक्षक, ६) आदिवासी विकास निरीक्षक, ७) कृषि सहाय्यक, ८) पशुधन विकास सहाय्यक,९) परिचारिका व १०) बहुद्देशिय आरोग्य कर्मचारी या दहा संवर्गातील रिक्त असलेली पदे स्थानिक अनुसूचित जमातीमधील उमेदवारांमधूनच भरण्याचे आदेश दिलेले आहेत.

३.१ संदर्भाधीन अनु. क्र.९ येथील दि.१४.८.२०१४ च्या अधिसूचनेन्वये "पशुधन विकास सहाय्यक" या पदाऐवजी "पशुधन विकास पर्यवेक्षक" असा पदनामात बदल करण्यात आला असून नव्याने "वन रक्षक" या पदाचा समावेश करण्यात आलेला आहे. संदर्भाधीन अनु. क्र.१० येथील दि.३१.१०.२०१४ च्या अधिसूचनेन्वये "कोतवाल" या पदाचा समावेश करण्यात आला आहे. त्यामुळे संवर्गाची संख्या १२ अशी झाली आहे.

४. या विभागाच्या संदर्भाधीन अनु.क्र.१० येथील दि.३१ जुलै,२०१४ च्या परिपत्रकान्वये उपरोक्त अनुसूचित क्षेत्रातील दहा संवर्गातील सर्व रिक्त पदे स्थानिक अनुसूचित जमाती मधील उमेदवारांमधून भरण्याबाबतच्या सूचना नियुक्ती प्राधिकाऱ्यांना देण्यात आलेल्या आहेत.

५. मा.राज्यपाल यांच्या अधिसूचनेनुसार करावयाच्या कार्यवाहीबाबत सविस्तर सूचना देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्याबाबत आता पुढील प्रमाणे सूचना या शासन निर्णयान्वये देण्यात येत आहेत:-

## शासन निर्णय:-

१) ठाणे, पालघर, नाशिक, धुळे, नंदूरबार, जळगाव, अहमदनगर, पुणे, नांदेड, अमरावती, यवतमाळ, गडचिरोली व चंद्रपूर या जिल्हयांमध्ये अनुसूचित क्षेत्राचा समावेश होत आहे.

२) अनुसूचित क्षेत्रामध्ये समाविष्ट असलेल्या तालुक्यांची/गावांची खात्री सर्व संबंधित प्रशासकीय विभागांनी आदिवासी विकास विभागाकडून करावी. तसेच आदिवासी विकास विभागाने सदर गावांची सद्य:स्थिती दर्शविणारी तालुकानिहाय यादी सर्व विभागांना उपलब्ध करुन दयावी.

## अनुसूचित क्षेत्रांतर्गत करावयाची कार्यवाही

३) संबंधित नियुक्ती प्राधिकाऱ्यांनी प्रथमत: उपरोक्त १२ संवर्गात मंजूर असलेल्या पदांची अनुसूचित क्षेत्रात व अनुसूचित क्षेत्राबाहेर अशा दोन भागांत विभागणी करावी.

४) तद् नंतर अनुसूचित क्षेत्रामध्ये येणाऱ्या मंजूर पदांची व कार्यरत पदांची संख्या निश्चित करावी.

५) यापुढे, अनुसूचित क्षेत्रातील सर्व रिक्त पदे स्थानिक अनुसूचित जमातीच्या उमेदवारांमधून भरावयाची आहेत. ही कार्यवाही करत असतांना, सध्या अनुसूचित क्षेत्रात कार्यरत असलेली पदे खालील तक्त्याप्रमाणे दाखविण्यात यावीत.

| अनु. क्र. | कर्मचाऱ्याचे नांव | प्रवर्ग | नियुक्तीचा दिनांक | स्थानिक/ अस्थानिक |
|---|---|---|---|---|
| | | | | |

६) अनुसूचित क्षेत्रातील रिक्त पदांवर स्थानिक अनुसूचित जमातीच्या उमेदवारांमधून पदभरती करणे आवश्यक आहे. त्याकरीता सद्य:स्थितीत अनुसूचित क्षेत्राबाहेर कार्यरत असलेल्या स्थानिक अनुसूचित जमातीतील कर्मचाऱ्यांस प्रथम अनुसूचित क्षेत्रात जाण्यास इच्छुक आहेत किंवा नाहीत याबाबत त्यांचा विकल्प घेण्यात यावा.

७) सद्य:स्थितीत अनुसूचित क्षेत्राबाहेर कार्यरत स्थानिक अनुसूचित क्षेत्रातील उमेदवारांनी अनुसूचित क्षेत्रात काम करण्याचा विकल्प दिल्यास अनुसूचित क्षेत्रातील रिक्त पदे प्रथम त्यांच्या मधून भरण्यात यावीत.

८) वरील प्रमाणे विकल्पानुसार बदलीने पदभरती केल्यानंतर अनुसूचित क्षेत्रात रिक्त पदे राहिल्यास ती जाहिरातीव्दारे विहित कार्यपध्दतीचा अवलंब करुन स्थानिक अनुसूचित जमातीतील उमेदवारांमधून भरण्यात यावीत, त्यापैकी १/३ (एक तृतीयांश) पदे स्थानिक अनुसूचित जमातीतील महिला उमेदवारांमधून भरण्यात यावीत.

**अनुसूचित क्षेत्राबाहेर करावयाची कार्यवाही**

**९) उपरोक्त १२ संवर्गात, अनुसूचित क्षेत्रातील पदे स्थानिक अनुसूचित जमातीच्या उमेदवारांमधून भरावयाची आहेत. उपरोक्त १२ संवर्गात अनुसूचित क्षेत्राबाहेर अनुसूचित जमातीसाठी ७ टक्के आरक्षण या शासन निर्णयान्वये लागू करण्यात येत आहे. तसेच इतर प्रवर्गांच्या आरक्षणाची टक्केवारी महाराष्ट्र राज्य लोकसेवा ( अनुसूचित जाती, अनुसूचित जमाती, निरधिसूचित जमाती (विमुक्त जाती), भटक्या जमाती, विशेष मागास प्रवर्ग व इतर मागास वर्ग यांच्यासाठी आरक्षण) अधिनियम २००१ मधील कलम ४ (२) प्रमाणे लागू करण्यात यावी.**

१०) उपरोक्त मुद्दा क्र.३ प्रमाणे, उपरोक्त १२ संवर्गांची अनुसूचित क्षेत्राबाहेर येणारी मंजूर पदसंख्या निश्चित करावी व मंजूर पदसंख्येस वरील मुद्दा क्र ९ .मध्ये दर्शविल्याप्रमाणे आरक्षण लागू करण्यात यावे.

११) उपरोक्त १२ संवर्ग वगळता अन्य संवर्गात पूर्वीच्या संदर्भाधीन क्र.१ येथील दि.८.६.१९७२, संदर्भाधीन क्र. २ येथील दि. १५.१०.१९८७ , संदर्भाधीन क्र. ३ येथील दि.१८.६.१९९४, संदर्भाधीन क्र. ४ येथील दि.१.९.१९९७, संदर्भाधीन क्र. ५ येथील दि.२२.९.१९९९ आणि संदर्भाधीन क्र. ६ येथील दि.१३.८.२००२ च्या प्रशासकीय आदेशांप्रमाणे ज्या जिल्हयांसाठी अनुसूचित जमातीसाठी वाढीव आरक्षण विहित केले आहे ते लागू राहील.

महाराष्ट्र राज्य विशेष मागास प्रवर्ग- अ (एसबीसी-ए) करिता (राज्यातील शैक्षणिक संस्थांमधील जागांच्या प्रवेशाचे आणि राज्याच्या नियंत्रणाखालील लोकसेवांमधील नियुक्त्यांचे किंवा पदांचे ) आरक्षण अध्यादेश, २०१४ (सन २०१४ चा महाराष्ट्र अध्यादेश क्र. १४ ) अन्वये “ विशेष मागास प्रवर्ग-अ (एसबीसी-ए)” निर्माण करण्यात आला होता, सदर

अध्यादेशातील कलम ४(१) नुसार या प्रवर्गास सरळसेवेच्या पदभरतीमध्ये ५ टक्के आरक्षण विहित करण्यात आले होते. सदर अध्यादेशाचे कायद्यात रुपांतर न झाल्यामुळे हा अध्यादेश दि २३.१२.२०१४.रोजी व्यपगत झालेला आहे, ही वस्तुस्थिती विचारात घेता, सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय, क्र. बीसीसी-२०१४/ प्र.क्र.२१६-ए /२०१४ /१६-ब, दि.२४.७.२०१४ हा शासन निर्णय, या विभागाच्या समक्रमांकाच्या दि. २ मार्च, २०१५ रोजीच्या शासन निर्णयाव्दारे रद्द करण्यात आला आहे.

शैक्षणिक व सामाजिकदृष्टया मागास प्रवर्गाकरिता विहित केलेल्या आरक्षणाबाबत सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय, क्र.बीसीसी-२०१३/प्रक ३५४/भाग-२/१३/१६-ब, दि.२१ फेब्रुवारी, २०१५ अन्वये निर्गमित केलेल्या सुचनांनुसार कार्यवाही करावी.

१२) मा.उच्च न्यायालय, मुंबई येथे दाखल करण्यात आलेल्या रिट याचिका क्रमांक ८७८३/२०१४ बिगर आदिवासी हक्क बचाव समिती विरूध्द महाराष्ट्र शासन व इतर, या प्रकरणी मा.उच्च न्यायालयाने दिनांक २७.१.२०१५ रोजी दिलेल्या आदेशाच्या अनुषंगाने, अप्पर आयुक्त, आदिवासी विकास, ठाणे यांच्या कार्यक्षेत्रातील अनुसूचित क्षेत्रातील आदिवासी विकास निरीक्षक आणि शिक्षक या भरती प्रक्रियेस स्थगिती दिली आहे. ही वस्तुस्थिती विचारात घेता, त्यांच्या कार्यक्षेत्रात न्यायालयीन निर्णयानुसार कार्यवाही करावी.

१३) मा.राज्यपालांच्या अधिसुचनेनुसार अनुसूचित क्षेत्रातील रिक्त पदे स्थानिक अनुसूचित जमातीच्या उमेदवारांमधून भरावयाची आहेत. असे करत असतांना, प्रथम अनुसूचित क्षेत्रात सध्या प्रवर्ग निहाय कार्यरत असलेल्या कर्मचाऱ्यांना, अनुसूचित क्षेत्राबाहेर रिक्त असलेल्या पदांवर त्या- त्या प्रवर्गात उपलब्धतेनुसार आणि त्यांचा विकल्प घेऊन बदलीने नियुक्ती दयावी व यामुळे रिक्त होणारी अनुसूचित क्षेत्रातील पदे स्थानिक अनुसूचित जमातीमधील उमेदवारांमधून भरण्यात यावी. सद्य:स्थितीत जे कर्मचारी अनुसूचित क्षेत्रात कार्यरत आहेत त्यांच्या बदल्या टप्प्याटप्प्याने कराव्यात. (करण्यात येणाऱ्या बदल्या विकल्पाच्या मर्यादेत पण जास्तीत जास्त अनुसूचित क्षेत्रातील संवर्गातील मंजूर पदांच्या साधारण प्रतिवर्षी २०% च्या मर्यादेपर्यंत प्रशासकीय सोईनुसार कराव्यात) तथापि अनुसूचित क्षेत्रातील पदे स्थानिक अनुसूचित जमातीच्या उमेदवारांमधून भरल्यानंतरच अनुसूचित क्षेत्राबाहेर जाण्याचा विकल्प दिलेल्या कर्मचाऱ्यास कार्यमुक्त करावे, हे करताना सेवाज्येष्ठ कर्मचा-याला प्रथम कार्यमुक्त करावे.

१४) वरीलप्रमाणे कार्यवाही पूर्ण होईपर्यंत संपूर्ण जिल्हयासाठी वरील १२ संवर्गाकरिता एकच बिंदुनामावली ठेवावी.

१५) अनुसूचित क्षेत्रात व अनुसूचित क्षेत्राबाहेर पद भरती करत असतांना सदर पद भरतीमुळे एकूण मंजूर पदांच्या संख्येत वाढ होणार नाही याची दक्षता घेण्यात यावी.

१६) उक्त मार्गदर्शक सूचना सर्व संबंधित प्रशासकीय विभागांनी त्यांच्या अधिनस्त असलेल्या सर्व संबंधित नियुक्ती प्राधिकाऱ्यांच्या निदर्शनास आणाव्यात. वरील प्रमाणे सर्व मार्गदर्शक सूचनांनुसार नियुक्ती प्राधिकाऱ्यांनी कार्यवाही करावी.

१७) वरील प्रमाणे कार्यवाही केल्यानंतर पदभरती करतांना काही अडचणी उद्भवल्यास, विभागाने सविस्तर तपशीलासह प्रशासकीय विभागांमार्फत सामान्य प्रशासन विभागाकडे मार्गदर्शनासाठी प्रस्ताव सादर करावा. यासाठी योग्य ते निर्णय शासन मान्यतेने घेण्यास सामान्य प्रशासन विभागास या शासन निर्णयाद्वारे प्राधिकृत करण्यात येत आहे.

सदरहू शासन निर्णय शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध असून त्याचा संगणक सांकेतांक क्रमांक २०१५०३०५१६४९३१७९०७ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Tikaram Waman Karpate

Digitally signed by Tikaram Waman Karpate
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Deputy Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=9395c596b57a69fe04109b8c8191e7389cff5eda3fac16c6f8263be7fbbd319d, cn=Tikaram Waman Karpate
Date: 2015.03.07 13:10:35 +05'30'

**( टि.वा. करपते )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रति,**

१. राज्यपाल यांचे सचिव
२. मुख्यमंत्र्यांचे सचिव
३. सर्व मंत्री/राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव
४. मा.विरोधी पक्षनेता, विधानपरिषद
५. मा.विरोधी पक्षनेता, विधानसभा
६. सर्व विधानसभा सदस्य/विधानपरिषद सदस्य.
७. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य
८. अपर मुख्य सचिव,(प्र.सु.,र.व का., वि.चौ.) सामान्य प्रशासन विभाग
९. अपर मुख्य सचिव,महसूल व वन विभाग
१०.अपर मुख्य सचिव, (कृषि), कृषि व पदुम विभाग
११.प्रधान सचिव (सेवा), सामान्य प्रशासन विभाग

१२.प्रधान सचिव, ग्राम विकास विभाग

१३.प्रधान सचिव, सार्वजनिक आरोग्य विभाग

१४.प्रधान सचिव, महिला व बालकल्याण विभाग

१५.प्रधान सचिव, आदिवासी विकास विभाग,

१६.प्रधान सचिव, विधी व न्याय विभाग

१७.सचिव, (साविस) सामान्य प्रशासन विभाग

१८. सचिव, शालेय शिक्षण विभाग

१९.सचिव, (पदुम) कृषि व पदुम विभाग

२०.प्रधान सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय (विधानसभा)

२१.प्रधान सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय (विधानपरिषद)

२२.सर्व विभागीय आयुक्त,

२३.सर्व जिल्हाधिकारी,

२४.सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी,

२५.प्रबंधक, उच्च न्यायालय, मुळ शाखा, मुंबई,

२६.प्रबंधक, उच्च न्यायालय, अपील शाखा, मुंबई,

२७.प्रबंधक, लोकायुक्त आणि उपलोकायुक्त यांचे कार्यालय, मुंबई,

२८. सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई,

२९.महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई,

३०.राज्यातील सर्व महामंडळे आणि उपक्रम यांचे व्यवस्थापकीय संचालक,

३१.सर्व महानगरपालिकांचे आयुक्त,

३२.सर्व मुख्याधिकारी, नगरपरिषदा/नगरपालिका,

३३.संचालक, समाजकल्याण, पुणे,

३४.आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक,

३५.संचालक, आदिवासी संशोधन व प्रशिक्षण संस्था, पुणे,

३६.संचालक, सेवायोजन, मुंबई,

३७.महालेखापाल, महाराष्ट्र १/२ (लेखा व अनुज्ञेयता), मुंबई/नागपूर,

३८. महालेखापाल, महाराष्ट्र १/२ (लेखा परीक्षा), मुंबई/नागपूर,

३९.अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,

४०.निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,

४१.ग्रंथपाल, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, विधानभवन मुंबई

४२.निवड नस्ती, कार्यासन १६-ब.

************